सन २०१३ च्या तुकडीतील परिवीक्षाधीन उप मुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी गट-अ आणि परिवीक्षाधीन सहायक गट विकास अधिकारी गट-ब यांना जिल्हा स्तरावरील ६६ आठवडयांच्या प्रशिक्षणांतर्गत स्वतंत्र कार्यभारासाठी नियुक्ती देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांकः मविसे-१०१५/प्र.क्र.१९४/२०१५/आस्था-३**
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, मुंबई- ४०० ००१.
तारीख : ११ सप्टेंबर, २०१५.

**संदर्भ-**

१) शासन निर्णय, ग्राम विकास विभाग, क्र.मविसे-१०/२०१४/प्र.क्र.५६/आस्था-३अ, दिनांक १३.११.२०१४.
२) शासन आदेश, ग्राम विकास विभाग, क्र.मविसे-१०१५/प्र.क्र.१९४/२०१५/आस्था-३, दिनांक २७.०८.२०१५.
३) शासन आदेश, ग्राम विकास विभाग, क्र.मविसे-१०१५/प्र.क्र.१९४/२०१५/आस्था-३, दिनांक ३१.०८.२०१५.

**शासन आदेश :-**

उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील शासन आदेशान्वये एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१ मधील ६६ आठवडयांच्या प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत श्री.गणेश भास्कर मोरे, परिविक्षाधीन अधिकारी गट-अ यांना गट विकास अधिकारी, पंचायत समिती उदगीर, जि.लातूर आणि श्रीमती मीना जान्या रावतळे, परिविक्षाधीन अधिकारी गट-अ यांना गट विकास अधिकारी, पंचायत समिती महाड, जि.रायगड या पदावर स्वतंत्र कार्यभार प्रशिक्षणासाठी पदस्थापना देण्यात आली आहे.

२. उपरोक्त संदर्भ क्र.२ च्या आदेशातील अ.क्र.४ वरील श्री.मोरे गणेश भास्कर, गट विकास अधिकारी, पंचायत समिती उदगीर, जि.लातूर आणि अ.क्र.४७ वरील श्रीमती रावतळे मीना जान्या यांच्या पदस्थापनेत अंशत: बदल करुन त्यांना सोबतच्या परिशिष्ट-अ मध्ये नमूद केल्याप्रमाणे गट विकास अधिकारी गट-अ पदाचा सुधारीत स्वतंत्र कार्यभार देण्यात येत आहे.

३.	संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी त्यांच्या अधिनस्त असलेल्या एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१ मधील परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांना स्वतंत्र कार्यभाराच्या पदावर रुजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच संबंधित परिवीक्षाधीन अधिकारी यांनी परिशिष्ट-अ मध्ये त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर तात्काळ हजर होऊन रुजू अहवाल संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

४.	मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड आणि यवतमाळ यांनी सदर परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांना दिनांक १२.२.२०१६ रोजी (म.नं.) पुढील प्रशिक्षणासाठी कार्यमुक्त करावे.

५.	सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०९१११३८४९७१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHINDE VIJAY DATTATRAYA

Digitally signed by SHINDE VIJAY DATTATRAYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GAD,CID - 917064, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SHINDE VIJAY DATTATRAYA
Date: 2015.09.11 12:10:43 +05'30'

( वि.द. शिंदे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
२. मा.प्रधान सचिव (ग्रा.वि. व पं.रा.), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. महासंचालक, यशदा, पुणे
४. विभागीय आयुक्त, कोकण / औरंगाबाद / अमरावती.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड / लातूर / यवतमाळ
६. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड / लातूर / यवतमाळ
७. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड / लातूर / यवतमाळ
८. महालेखापाल, महाराष्ट्र-१ / २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर
९. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
१०. संबंधित परिवीक्षाधीन अधिकारी (मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर / रायगड यांच्यामार्फत)
११. अर्थसंकल्प-३, १६ व व्यय-१५, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कार्यासन, वित्त-१, आस्था-३अ, वित्त-९, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. निवड नस्ती (कार्यासन आस्था-३)

परिशिष्ट-अ

एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१
उप मुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी, गट-अ पदाचा स्वतंत्र कार्यभार
प्रशिक्षणासाठी पदस्थापना देण्याबाबत

| **अ. क्र.** | अधिकाऱ्याचे नाव | स्व-जिल्हा | प्रशिक्षणासाठी देण्यात आलेला जिल्हा | स्वतंत्र कार्यभार प्रशिक्षणासाठी पदस्थापना | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १. | श्रीमती रावतळे मीना जान्या | नंदुरबार | जि.प. ठाणे | गट विकास अधिकारी, पंचायत समिती मुरुड, जि.रायगड | दि.२७.८.२०१५ च्या आदेशातील अ.क्र.४७ मध्ये अंशत: बदल करुन |
| २. | श्री.मोरे गणेश भास्कर | सोलापूर | जि.प. लातूर | गट विकास अधिकारी, पंचायत समिती दिग्रस, जि.यवतमाळ | दि.२७.८.२०१५ च्या आदेशातील अ.क्र.४ मध्ये अंशत: बदल करुन |

**********